महाराष्ट्र गौरव पुरस्कार योजनेखाली
सैन्यातील शौर्यपदक/सेवापदक धारकांना
अनुज्ञेय रक्कम मंजूर करणेबाबत.
एअर मार्शल अदी रूस्तमजी गांधी, जि.पुणे.

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः मगौपु-२०२०/प्र.क्र.५३ /२८**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
तारीख: - ११/०३/२०२०.

वाचा-

१) शासन निर्णय,सा.प्र.वि. क्र. शौपपु-२०००/३०३/प्र. क्र.३१(२०००)/२८, दिनांक ०३.०७.२०००
२) शासन निर्णय,सा.प्र.वि. क्र. शौपपु-२००१/२८९८/प्र.क्र.१६/२००२)/२८,दिनांक १६.०८.२००२
३) शासन निर्णय,सा.प्र.वि. क्र. शौपपु-२००३/प्र.क्र.११३/२००३/२८,दिनांक ०३.०९.२००३
४) शासन निर्णय,सा.प्र.वि. क्र. मगौपु-२०१६/प्र.क्र.२४७/२८,दिनांक ०२.०३.२०१९
५) संचालक,सैनिक कल्याण विभाग,पुणे यांचे पत्र क्र.१६२११/गौ.पु/प्रस्ताव/सैकवि-१६ दिनांक १०/०२/२०२०.

प्रस्तावना-

महाराष्ट्र गौरव पुरस्कार योजनेंतर्गत सैन्यातील १६ प्रकारच्या शौर्यपदक/सेवापदक धारकांना शासकीय अनुदान देण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे. एअर मार्शल अदी रूस्तमजी गांधी यांना परम विशिष्ट सेवा पदक प्राप्त झाल्या कारणाने रू. १,१५,०००/- रक्कम अनुज्ञेय आहे. तथापी शासन निर्णय, सा.प्र.वि.क्र.शौपपु-२००१/२८९८/प्र.क्र.१६/२००२)/२८,दिनांक १६.०८.२००२ अन्वये श्रेष्ठ पदक प्राप्त झालेल्यांना यापूर्वी गौरव पुरस्कार योजनेखाली मिळालेल्या पदकाची रक्कम व त्यानंतर मिळालेल्या श्रेष्ठ पदकासाठी अनुज्ञेय रक्कम यामधील फरकाची रक्कम देय आहे. शासन निर्णय,सा.प्र.वि. क्र. शौपपु-२००३/प्र.क्र.११३/२००३/२८, दिनांक ०३.०९.२००३ अन्वये श्री. अदी रूस्तमजी गांधी यांना परम विशिष्ट सेवा पदकाप्रित्यर्थ रक्कम रू. ५८,०००/- अदा करण्यात आली आहे. दरम्यान शासन निर्णय,सा.प्र.वि. क्र. मगौपु-२०१६/प्र.क्र.२४७/२८,दिनांक ०२.०३.२०१९ अन्वये महाराष्ट्र राज्यातील आजी /माजी सैनिकांना शौर्य/ सेवा पदक या संवर्गात एकापेक्षा जास्त पदके प्राप्त झाल्यास त्यांना महाराष्ट्र गौरव पुरस्कार योजनेअंतर्गत प्रत्येक शौर्य/ सेवापदकासाठी स्वतंत्र अनुदान देण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे.

शासन निर्णय-

उपरोक्त नमूद शासन निर्णय व प्रस्तावाच्या अनुषंगाने खालील तक्त्यात दर्शवल्याप्रमाणे महाराष्ट्र गौरव पुरस्कार योजनेखाली अनुज्ञेय असलेली अनुदानाची रक्कम देण्यास शासनाची मंजूरी प्रदान करण्यात येत आहे.

| अ. क्र. | शौर्य/सेवापदक धारकाचे पदनाम, नाव व पत्ता | शौर्य/सेवापदक | पदक प्राप्त झाल्याचा दिनांक | देय एकूण रोख रक्कम (रुपये) |
|---|---|---|---|---|
| १. | **एअर मार्शल अदी रूस्तमजी गांधी,** नं ३ फिओना, बिबवेवाडी- कोंढवा रोड, लुलानगर, पुणे - ४११००१ | **“परम विशिष्ट सेवा पदक ”** | २६ जानेवारी, २००३ | ५७,०००/- |
| | | | **एकूण** | **५७,०००/-** |

२. महाराष्ट्र गौरव पुरस्कार योजनेअंतर्गत अनुज्ञेय ठरविलेल्या रक्कमेपैकी रू. २८,५००/- (अठ्ठावीस हजार पाचशे फक्त) शासकीय अनुदानातून तर उर्वरित ५० % रक्कम म्हणजे रु. २८,५००/- (अठठावीस हजार पाचशे फक्त) मुख्यमंत्री सहायता (कारगिल) निधीतून अदा करण्यात यावी.

३. वरील परिच्छेद क्र. २ मध्ये नमूद शासन अनुदानातून द्यावयाच्या रकमेपोटी होणारा खर्च रु. २८,५००/- (अठठावीस हजार पाचशे फक्त) इतका खर्च 'मागणी क्र.ए-४, लेखाशिर्ष २०७५, संकीर्ण सर्वसाधारण सेवा,८०० -इतर खर्च,(००)(०५) शौर्यासाठी पारितोषिके (२०७५ ०११ ३) ०५ - बक्षिसे' या लेखाशीर्षाखाली सन २०१९-२० या वित्तीय वर्षाकरीता मंजूर असलेल्या अर्थसंकल्पीय तरतुदीमधून भागविण्यात यावा. तसेच सदरचा खर्च हा मासिक निधी विवरणपत्रानुसार करण्याची दक्षता घेण्यात यावी.

४. प्रस्तुत प्रकरणी 'आहरण व संवितरण अधिकारी', म्हणून जिल्हा सैनिक कल्याण अधिकारी, पुणे यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.**सदरची रक्कम जिल्हा सैनिक कल्याण अधिकारी,पुणे यांनी कोषागार कार्यालय, पुणे येथून आहरीत करुन संबंधितांना विहीत पध्दतीने वितरीत करण्यात यावी.**

५. वरील तक्त्यात नमूद केलेली संबंधित रक्कम लाभार्थ्याची पात्रता काळजीपूर्वक तपासून विहीत मुदतीत देण्याच्या सूचना संचालक, सैनिक कल्याण विभाग, पुणे यांनी त्यांच्या अधिनस्त असलेल्या क्षेत्रीय अधिका-यांना द्याव्यात व तत्संबंधीचा अहवाल तात्काळ शासनास पाठवावा.

६. हा शासन निर्णय, वित्त विभागाच्या सहमतीने निर्गमित केलेल्या **शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय,सा.प्र.वि. क्र. मगौपु-२०१६/प्र.क्र.२४७/२८,दिनांक ०२.०३.२०१९** मधील मार्गदर्शक तत्वांचा अवलंब करुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००३१३११५३१७१८०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Suresh Mahadeo Khade

Digitally signed by Suresh Mahadeo Khade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=14c299447f4a6e6c33ab3f7a85fbf010628981e82f8311a81d1cf974681485c2, serialNumber=f0b4c833a6fc7c6fb7cb0a96a3e2bb79d42d283b8f0f7bfc1ae95298d60bacf1, cn=Suresh Mahadeo Khade
Date: 2020.03.13 11:56:20 +05'30'

**( सु. म. खाडे )**

उप सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रत,**

१. महालेखापाल (लेखा परीक्षा)-१/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,

२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,

३. महालेखापाल (स्थानिक निकाय लेखा परीक्षा व लेखा) महाराष्ट्र, मुंबई-३२,

४. कमांडर, महाराष्ट्र-गुजरात एरिया मुख्यालय, कुलाबा, मुंबई ४०० ००५,

५. जिल्हाधिकारी,पुणे,

६. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे,

७. संचालक, सैनिक कल्याण विभाग, पुणे ४११ ००६ ( ५ प्रती),

८. जिल्हा सैनिक कल्याण अधिकारी,पुणे,

९. सह संचालक, लेखा व कोषागार, संगणक कक्ष, ५ वा मजला, नवीन प्रशासन भवन, मुंबई,

१०. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय मुंबई

११. **एअर मार्शल अदी रूस्तमजी गांधी** नं ३ फिओना, बिबवेवाडी- कोंढवा रोड, लुलानगर, पुणे - ४११००१

१२. वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,

१३. प्रत संग्रहार्थ.